Quality Council of India यांच्यामार्फत राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे Accreditation करुन घेण्यासाठी निधीची तरतूद करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयटीआय-२०१४/प्र.क्र. ९०/व्यशि-३**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ जानेवारी, २०१५

**संदर्भ :**

१. डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचे क्र. DGET-१९/१६/२०१२-CD, दि.२७ नोव्हेंबर, २०१३ चे पत्र
२. डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांचे क्र. DGET-१९/०९/२०१३-CD(PL), दि.०४ मार्च, २०१४ चे पत्र
३. डी.जी.ई.टी.,नवी दिल्ली यांचे क्र. DGET-३५(१३९६)/Guidelines/२०१३-NIC, दि.२८ एप्रिल, २०१४ चे पत्र
४. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्रमांक.१२/संलग्नता/२०१४/४४३, दिनांक २५/०६/२०१४.
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१४/प्र.क्र.९०/व्यशि-३, दि. ०३/०७/२०१४

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय व्यवसाय प्रशिक्षण परिषद (NCVT) नवी दिल्ली यांच्या ४० व्या बैठकीमध्ये मान्य झाल्यानुसार देशातील औ.प्र.संस्थांकरीता एनसीव्हीटीची संलग्नता मिळविण्यासाठी त्यापुर्वी Quality Council of India ची अधिस्विकृती (Accreditation) प्राप्त करणे आवश्यक आहे. त्यानुसार डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांनी वेळोवेळी दिलेल्या मागदर्शक सुचनांनुसार राज्यातील ४१७ शासकीय औ.प्र.संस्थांचे QCI कडून टप्प्या-टप्प्याने Accreditation करून घेणे आवश्यक आहे. Quality Council of India कडून Accreditation मिळविण्यासाठी QCI ने स्वत:ची वेब साईट विकसित केली असून ऑन लाईन प्रणालीव्दारे Accreditation प्रक्रिया ही डेक्स टॉप रिव्ह्यु, फिजीकल व्हेरीफिकेशन व ॲन्युअल सर्व्हिलन्स या तीन स्तरावर होणार आहे. त्याकरिता QCI कडे खालीलप्रमाणे शुल्काची रक्कम जमा करणे आवश्यक आहे.

| | Upto Two Trades and Twelve Units | More than Two Trades and Twelve Units |
|---|---|---|
| Application Fee | Rs.10000 | Rs.10000 |
| Site Assessment Fee | Rs.20000 | Rs.25000 |
| Surveillance Fee (Two Times) | Rs.17500 | Rs.20000 |
| **Total** | **Rs.65000** | **Rs.75000** |

त्या अनुषंगाने राज्यातील PPP या योजनेअंतर्गत समाविष्ट असलेल्या शासकीय औ. प्र.संस्थांना QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक असलेले शुल्क भरण्याबाबत डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ३ च्या पत्राव्दारे कळविल्यानुसार त्या संस्थांच्या IMC कडे उपलब्ध असलेल्या रकमेतून सदर शुल्क भरण्यास संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात आलेली आहे. PPP या योजनेखाली समाविष्ट नसलेल्या उर्वरित शासकीय औ. प्र. संस्थांना QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक असलेले शुल्क भरण्यासाठी तरतूद उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील ४१७ शासकीय औ.प्र.संस्थांपैकी PPP (Public Private Partnership) या योजनेअंतर्गत समाविष्ट नसलेल्या संस्थांना QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक असलेले वरील नमुद शुल्क खालील तरतूदीमधून भरण्यास मान्यता देण्यात येत आहे-

१) संबंधित संस्था PPP योजनेंतर्गत समाविष्ट नसेल तर त्या संस्थेस QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक असलेले शुल्क त्या संस्थेच्या स्वीय प्रपंची लेख्यामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भरण्यात यावे.

२) संबंधित संस्था PPP या योजनेंतर्गत समाविष्ट नसल्यास अथवा त्या संस्थेस स्वत:चे स्वीय प्रपंची खाते नसल्यास किंवा स्वीय प्रपंची लेखा खात्यात पुरेसा निधी उपलब्ध नसल्यास अशा संस्थांचा QCI अधिस्विकृतीच्या मान्यतेसाठीचा खर्च, ती संस्था ज्या जिल्हयांतर्गत येते त्या जिल्हास्तरीय शासकीय औ. प्र. संस्थेच्या स्वीय प्रपंची लेख्यातून अथवा स्वीय प्रपंची लेख्यात रक्कम उपलब्ध असलेल्या लगतच्या औ. प्र. संस्थेच्या लेख्यातून भागविण्यात यावा.

२. **अटी :**

१) QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक शुल्क भरल्यानंतर संबंधित संस्थेची QCI व्दारे तपासणी करण्यात येणार आहे. तथापि, सदर तपासणी वेळी जर संबंधित संस्थेने सर्व बाबींची आवश्यक ती पुर्तता न केल्याने त्या संस्थेची पुन्हा तपासणी करणे गरजेचे ठरल्यास प्रथम पुनर्तपासणीसाठी रू. २०,०००/- आणि व्दितीय व त्या पुढील पुनर्तपासणीसाठी रू. ३०,०००/- एवढे शुल्क आकारण्यात येणार आहे. अशा प्रकारे एखादया संस्थेने आवश्यक बाबींची पुर्तता न करताच QCI कडे अर्ज केल्यामुळे सदर संस्थेची पुनर्तपासणी करावी लागली तर सदर

पुनर्तपासणीच्या शुल्काची रक्कम संबंधित विभागाचे सहसंचालक, संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी आणि संबंधित प्राचार्य यांच्या वैयक्तीक वेतनातून समप्रमाणात वसूल करण्यात येईल.

२) QCI ची अधिस्विकृती प्राप्त होण्यासाठी करण्यात येणाऱ्या कार्यवाहीचा दरमहा प्रगती अहवाल (परिपूर्ण तपशीलासह) शासनास सादर करावा.

३) या संदर्भात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे. त्यामध्ये कोणत्याही प्रकारचा निष्काळजीपणा/अनियमितता झाल्याचे निर्दशनास आल्यास त्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांवर निश्चित करण्यात येईल.

४) सदर संस्थांनी QCI कडे वरील प्रमाणे जमा करावयाच्या शुल्काची प्रतिपूर्ती शासनाकडून मिळणार नाही.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८८२/व्यय-५, दि. २९/११/२०१४ व अनौपचारिक संदर्भ क्र. २३१/कोषा-५, दि. १६/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१६२०३२५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajaram Gobara Jadhav

Digitally signed by Rajaram Gobara Jadhav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajaram Gobara Jadhav
Date: 2015.01.31 11:40:39 +05'30'

( रा. गो. जाधव )

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)

३. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)

६. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत)

७. संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)

८. निवड नस्ती (व्यशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मुंबई.